**राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची १५० वी जयंती साजरी करण्यानिमित्त राज्यस्तरीय समितीचे गठण करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२० /प्र.क्र.०४ /पंरा-१**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: १७ सप्टेंबर, २०२०

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८५ /पंरा-१ दिनांक १६ एप्रिल, २०१८.**
२) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८४ /पंरा-१ दिनांक २४ सप्टेंबर, २०१८.**

**प्रस्तावना :-**

राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांची १५० वी जयंती समारंभ साजरा करण्यात येणार आहे. महात्मा गांधीजींनी दिलेली शिकवण व आचरणात आणलेली मुल्ये आपल्या कृतीतून पुढे घेऊन जाण्याकरिता तसेच महात्मा गांधी यांचा संदेश जगभरातील पुढील पिढ्यांपर्यंत जिवंत ठेवणे आवश्यक असल्याने सन २०१८ या वर्षापासून विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यासंदर्भात केंद्र शासनाच्या स्तरावर एक समिती स्थापन करण्यात आली आहे. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य हे सदर समितीचे सदस्य आहेत. महात्मा गांधीजींचे कार्य व त्यांच्या विचारधारेच्या अनुषंगाने महाराष्ट्र शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमाचा आराखडा तयार करणे व त्याची अंमलबजावणी करण्याकरिता संदर्भीय शासन निर्णयाद्वारे एक उच्चस्तरीय समिती मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आली आहे. राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची १५० वी जयंती साजरी करण्यानिमित्त एक राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

संदर्भाधीन क्र. २ अन्वये गठीत करण्यात आलेली राज्य स्तरीय समिती रद्द करण्यात आली असून राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांची १५० वी जयंती साजरी करण्यानिमित्त खालीलप्रमाणे नवीन राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

| अ.क्र | पदनाम | पदाधिकारी |
|---|---|---|
| १ | **मा.उपमुख्यमंत्री** | **अध्यक्ष** |
| २ | मा.मंत्री, ग्रामविकास | सह अध्यक्ष |
| ३ | मा.मंत्री ,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास | सदस्य |
| ४ | मा. मंत्री,उद्योग | सदस्य |
| ५ | मा. राज्यमंत्री,ग्रामविकास | सदस्य |
| ६ | अतिरिक्त मुख्य सचिव ( ग्रा.वि. व पं.रा. ) | सदस्य सचिव |

सदर राज्यस्तरीय समिती संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तरीय समिती तसेच राज्यात राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांची १५० वी जयंती साजरी करण्यानिमित्त राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रम यांवर देखरेख, नियंत्रण ठेवेल व मार्गदर्शन करील. तसेच सदर समिती आवश्यकतेनुसार आढावा घेईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१७११३४५७३१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

sharad yadav

Digitally signed by sharad yadav
DN: cn=sharad yadav, o=rdd, ou=desk officer, email=sharad.yadav64@nic.in, c=IN
Date: 2020.09.17 14:54:09 +05'30'

**( शरद यादव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, उद्योग, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई
८. सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व)
१२. अतिरिक्त मुख्य सचिव ( ग्रा. वि. व पं.रा. ) यांचे स्वीय सहाय्यक
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१४. निवड नस्ती/पंरा-१